**शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचा-यांच्या नियुक्ती, वैयक्तिक मान्यता, पदोन्नती व अनुषंगिक बाबीं संदर्भात मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र. एसएसएन-२०१७/(२०/१७)/टीएनटी-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २३ ऑगस्ट, २०१७

वाचा - १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.एसएसएन-१००७/(३६/०७)/ माशि-२, दि.६ फेब्रुवारी, २०१२

प्रस्तावना :-

शिक्षक / शिक्षकेतर कर्मचा्-यांच्या नियुक्ती, वैयक्तिक मान्यता, पदोन्नती व अनुषंगिक बाबीं संदर्भात संदर्भाधीन शासन निर्णय क्र.एसएसएन-१००७/(३६/०७)/माशि-२, दि.६ फेब्रुवारी, २०१२ अन्वये सर्वसमावेशक मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत. तसेच विशेष पटपडताळणी मोहिमेच्या अनुषंगाने शासन निर्णय दिनांक २ मे, २०१२ नुसार पटपडताळणीनंतर शिक्षक नियुक्तीसंदर्भात अनियमितता आढळून आलेल्या प्रकरणी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी मान्यता दिलेल्या प्रकरणी तपासून सुनावणी घेण्याबाबत शिक्षणाधिकारी / शिक्षण उपसंचालक यांना निर्देश दिले होते. त्यानुसार संबंधित शिक्षणाधिकारी /शिक्षण उपसंचालक यांनी सुनावणी घेऊन काही शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांच्या मान्यता रद्द केल्या. याविरुध्द संबंधित शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांनी मा.उच्च न्यायालयामध्ये याचिका दाखल केल्या आहेत.

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.१०१३३/२०१६ मध्ये खालीलप्रमाणे निरीक्षण नोंदविले आहे.

"By now, it is settled principle of law that unless the power of review is specifically or by necessary implication provided, the authority cannot review its own order. No doubt, if an order is obtained by exercising fraud, it would stand vitiated. However, it is not the case of the respondent Education Officer that the petitioners have obtained their initially orders by fraudulent means. It is further observed in the said order as under if the earlier Education Officer had granted approval to the petitioners' appointment, may be erroneously, the same cannot be made a ground to recall the same and pass contrary order, unless a case of fraud, mispresentation or suppression is made out. Particularly, when most of the petitioners have already put in their services for 11 years, the impugned orders would amout to penalising them for no fault on their part."

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.८८१८/२०१७ व इतर संलग्न याचिकांमध्ये दिनांक १४ ऑगस्ट, २०१७ मध्ये दिलेल्या आदेशामध्ये देखील वरील बाब स्पष्ट करण्यात आली आहे.

३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या उपरोक्त निरीक्षणास अनुसरुन संदर्भाधीन शासन निर्णय दि.६ फेब्रुवारी, २०१२ मधील (क) मध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक :-**

शासन निर्णय क्र.एसएसएन१००७/(३६/०७)/माशि-२, दि.६ फेब्रुवारी, २०१२ मधील (क) येथील तरतुद वगळण्यात येत असून सुधारीत तरतुद खालीलप्रमाणे राहील :-

**(क) दिलेली वैयक्तिक मान्यता रद्द करणे :-**

शिक्षक / शिक्षकेतर कर्मचा-यांची दिलेली वैयक्तिक मान्यता कोणत्याही कारणाने रद्द करणे क्रमप्राप्त असल्यास त्यापूर्वी ज्या सक्षम प्राधिका-याने वैयक्तिक मान्यता दिलेली आहे अशा अधिका-याच्या लगतच्या वरिष्ठ प्राधिका-याने संबंधित कर्मचारी, संस्था यांना कारणे दाखवा नोटीस देऊन त्यांना त्यांची बाजू मांडण्याची संधी द्यावी. त्यानंतर नियमानुसार योग्य तो निर्णय घ्यावा.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०८२३१७१६१९९१२१ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशा नुसार व नावाने,

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b95235 37dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2017.08.23 18:27:35 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय,मंत्रालय,मुंबई,
३) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
४) शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य,पुणे-१,
५) शिक्षण संचालक, (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे-१,
६) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे,

७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

८) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,

९) सर्व शिक्षणाधिकारी ( प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद/ सर्व शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई

१०) मा.मंत्री शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय,मुंबई,

११) निवडनस्ती, ( टीएनटी-२ ).